साथरोग नियंत्रण कार्यक्रम (लेखाशिर्ष २२१०४२८६) अंतर्गत सन २०२१-२२ च्या पुरवणी मागणी अनुदानातून कोविड १९ प्रतिबंधात्मक उपाययोजनांकरीता आवश्यक असलेल्या **Inj. Methyl Prednisolone 500 mg, Tab. Paracetamol 500 mg, Azithromycin Syrup 200mg/ 5ml, 15 ml Bottle** च्या खरेदीसाठी सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२१/प्र.क्र.१४२/आरोग्य-८

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २० जानेवारी, २०२२

वाचा :-

१) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. प्रशामा-१२२१/प्र.क्र.१४२/आरोग्य-८ दि.२३.०८.२०२१.

२) संचालक,आरोग्य सेवा,पुणे यांचे पत्र क्र.संआसे/कोरोना नियंत्रण कक्ष/ पुरवणी मागणी अनुदान २०२१-२२ अंतर्गत ३ बाबींच्या खरेदीसाठी सुधारित प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत/२६४०२-०३/२०२१, दि.२८.१२.२०२१.

३) संचालक,आरोग्य सेवा,पुणे यांचे पत्र क्र.संआसे/कोरोना नियंत्रण कक्ष/ पुरवणी मागणी अनुदान २०२१-२२ अंतर्गत १ बाबींच्या खरेदीसाठी सुधारित प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत/२१०४७-४८/२०२१, दि.२८.१२.२०२१.

४) सहसंचालक आरोग्य सेवा (हि,ह व ज,रो) पुणे यांचे पत्र क्र.संआसे,पुणे/कोरोना नियंत्रण कक्ष/ पुरवणी मागणी अनुदान २०२१-२२ अंतर्गत प्रस्तावित ३ बाबींच्या निविदेनुसार प्रात दराने खरेदीसाठी सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत/७८८-९१/२०२१, दि.०५.०१.२०२२.

५) आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्याकडील दिनांक २७.१२.२०२१ व दिनांक २८.१२.२०२१ रोजीची मान्य टिप्पणी.

प्रस्तावना:-

संचालक, आरोग्य सेवा, पुणे यांनी दिनांक २८.१२.२०२१ रोजीच्या दोन प्रस्तावात प्रस्तावित केल्यानुसार, कोविड १९ प्रतिबंधात्मक उपाययोजनांकरीता आवश्यक असलेल्या Inj. Methyl Prednisolone ५०० mg, Tab.Paracetamol ५०० mg, Azithromycin Syrup २००mg/ ५ml, १५ ml Bottle या औषधांची खरेदी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात लेखाशिर्ष २२१०४२८६ अंतर्गत मंजुर करण्यात आलेल्या जुलै २०२१ च्या पुरवणी मागणीतील अनुदानाच्या मर्यादेतच करण्यासाठी अंदाजित

रु.६,७६,५८,२५२/- (एकूण रुपये सहा कोटी शहात्तर लक्ष आठावन्न हजार दोनशे बावन्न फक्त)इतक्या रकमेस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त वाचा येथील संदर्भ क्र.१ मधील शासन निर्णयान्वये, कोवीड-१९ या साथरोगावरील उपचारासाठी आवश्यक असणाऱ्या विविध २५ प्रकारच्या औषधी व तद्अनुषंगिक साहित्यांच्या खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संचालक, आरोग्य सेवा,पुणे कार्यालय यांनी त्यांच्या दिनांक २८.१२.२०२१ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या दोन प्रस्तावानुसार हाफकीन महामंडळाच्या खरेदी कक्षाकडील प्रत्यक्ष निविदा प्रक्रीया अंती प्राप्त झालेल्या दरानुसार व आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई यांनी प्रस्तावित केलेल्या दरानुसार - Inj. Methyl Prednisolone 500 mg, Tab.Paracetamol 500 mg, Azithromycin Syrup 200mg/ 5ml, 15 ml Bottle या औषधांची अंदाजित किंमत रु.६,७६,५८,२५२/- (एकूण रुपये सहा कोटी शहात्तर लक्ष आठावन्न हजार दोनशे बावन्न फक्त) इतक्या रकमेची खरेदी करण्यास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** सदर खरेदी साठी येणारा खर्च अंदाजित रु.६,७६,५८,२५२/- (एकूण रुपये सहा कोटी शहात्तर लक्ष आठावन्न हजार दोनशे बावन्न फक्त) सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात साथरोग नियंत्रण कार्यक्रम लेखाशिर्ष २२१०४२८६ अंतर्गत उपलब्ध असलेल्या पुरवणी मागणी अनुदानातुन हाफकिन खरेदी कक्षाकडे वर्ग करुन त्या अनुदानातुन भागविण्यात येणार आहे. खालील तक्त्यात नमुद औषधांची व तदअनुषंगीक साहित्याच्या खरेदीसाठीच्या सुधारित प्रशासकीय मान्यतेसाठीचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे :-

**(रक्कम रुपयात)**

| Sr. No | Name of Item | Approx. Rate per Unit as per A.A. Aproval Dt.23.08. 2021(in Rs.) | Approx. Quantity to be Procured (Nos.) | Approx. Amt. of Purchase Order as per A.A. Dt.23.08.2 021(in Rs.) | Rate received thro E – Tender@ HBPCL (Rate Per Unit) (in Rs.) | Qty. Proposed for Revised A.A. | Amount Required for Procureme nt as per Revised Rate (in Rs.) | Budget Source |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | Tab.Paracetamol 500 mg | 0.25 | 15000000 | 3750000 | 0.4850 | 15000000 | 7275000 | **Epidemic Control Programm e 22104286 (Proposed Supp. Demand 2021-22)** |
| 2 | Azithromycin Syrup 200mg/ 5ml, 15 ml Bottle | 11.25 | 170000 | 1895500 | 16.250 | 170000 | 2762500 | |
| 3 | Inj. Methyl Prednisolone 500 mg | 85.00 | 1200000 | 102000000 | 97.07 | 593600 | 57620752 | |
| **Total** | | | | | | | **67658252** | |

**०३.** वरील प्रस्तावाच्या अनुषंगाने कोविड १९- ची संभाव्य लाट विचारात घेवून उपचारात्मक व प्रतिबंधात्मक उपायोजनांकरिता राज्यात उद्भवलेल्या कोवीड-१९ च्या अनुषंगाने औषधाच्या खरेदीस सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावासाठी सादर करावयाची प्रमाणपत्रे (परिशिष्ट-अ) व विनियोग प्रमाणपत्र संचालक, आरोग्य सेवा,पुणे कार्यालय यांनी त्यांच्या दिनांक २८.१२.२०२१ रोजीच्या प्रस्तावानुसार प्रमाणित केलेले आहे.

०४. कोविड १९- ची संभाव्य लाट विचारात घेवून उपचारात्मक व प्रतिबंधात्मक उपायोजनांकरिता कोवीड-१९ च्या अनुषंगाने आवश्यक असलेल्या उपरोक्त औषधांच्या खरेदी करण्यासाठी अंदाजित रु.६,७६,५८,२५२/- (एकूण रुपये सहा कोटी शहात्तर लक्ष आठावन्न हजार दोनशे बावन्न फक्त) इतक्या रकमेच्या खरेदी करण्याच्या प्रस्तावास आयुक्त, आरोग्य सेवा, आयुक्तालय,मुंबई यांनी त्यांच्या दिनांक २७.१२.२०२१ व दिनांक २८.१२.२०२१ रोजीच्या टिप्पणीद्वारे मान्यता दिली आहे.

०५. संचालक, आरोग्य सेवा, पुणे यांनी प्रस्तावित केल्यानुसार, राज्यातील आरोग्य संस्थांना सन २०२१-२२ च्या पुरवणी मागणी अनुदानातून कोविड १९ प्रतिबंधात्मक उपाययोजनांकरीता आवश्यक असलेल्या उपरोक्त औषधांच्या खरेदी उपलब्ध असलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच करण्यात यावी. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे यांच्या दिनांक २८.१२.२०२१ रोजीच्या दोन प्रस्तावानुसार सादर करण्यात आलेल्या प्रमाणपत्र (परिशिष्ट-अ) मध्ये नमुद केलेल्या सदर खरेदी साठी येणारा खर्च अंदाजित रु.६,७६,५८,२५२/- (एकूण रुपये सहा कोटी शहात्तर लक्ष आठावन्न हजार दोनशे बावन्न फक्त) सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात साथरोग नियंत्रण कार्यक्रम लेखाशिर्ष २२१०४२८६ अंतर्गत उपलब्ध असलेल्या पुरवणी मागणी अनुदानातुन भागविण्यात यावा. शासन निर्णय दिनांक २३.०८.२०२१ मधील अटींच्या अधीन राहुन सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०६. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०११३१११९५११४१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30,
cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.01.20 11:39:37 +05'30'

**( वि. ल. लहाने )**
**सह सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि.परेल,मुंबई

३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई,पुणे.
४) सह संचालक,आरोग्य सेवा,रुग्णालये (राज्यस्तर),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
५) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
६) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),नागपूर
९) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
११) अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती/नाशिक
१२) निवडनस्ती (आरोग्य-८)